**शासकीय कर्मचा-यांचा सर्वंकष**
**माहितीकोष तयार करणेबाबत.**
Employees Master Database (EMDb)

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : असांसं १३१४/प्र.क्र. १७९/का-१४१७**
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : ०३ डिसेंबर, २०१६

अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई या कार्यालयाकडून महाराष्ट्र शासनाच्या सेवेतील सर्व कर्मचाऱ्यांचा, तसेच राज्यातील सर्व जिल्हा परिषदांतील कर्मचाऱ्यांचा सर्वंकष माहितीकोष दरवर्षी अद्यावत करण्याची कार्यवाही हाती घेण्यात आली आहे. या माहितीकोषामध्ये नियमित आस्थापनेवरील कर्मचारी व नियमितेतर आस्थापनेवरील कर्मचारी (कार्यव्ययी आस्थापनेवरील, रोजंदारीवरील, अंशकालीन, मानसेवी इत्यादी ) तसेच तदर्थ तत्वावर नेमणुका करण्यात आलेले कर्मचारी अशा सर्व प्रकारच्या कर्मचाऱ्यांची माहिति गोळा करण्यात येणार आहे. त्या आधारे सर्व कर्मचाऱ्यांच्या माहितीचा समावेश असलेला सर्वंकष माहितीकोष (Employees Master Database- EMDb) अद्यावत करण्यात येत आहे. त्या अनुषंगाने १ ऑक्टोबर, २०१६ या संदर्भ दिनांकास कर्मचाऱ्यांचा सेवार्थ I.D., भविष्य निर्वाह निधी / DCPS खाते क्रमांक, पॅन क्रमांक, कर्मचाऱ्याचे नाव, जन्मदिनांक, सेवेत रुजू झाल्याचा दिनांक, निवृत्तीचा दिनांक, लिंग, जात, धर्म, स्वग्राम, नि:समर्थ असलेली व्यक्ती, इ. स्थायी स्वरूपाची माहिति तसेच आश्वासित प्रगती योजना (पहिली १२ वर्षानंतर व दुसरी २४ वर्षानंतर), विभागीय परीक्षा इ. माहिति गोळा करण्यात येणार आहे. तसेच ऑक्टोबर, २०१६ या संपूर्ण महिन्याच्या वित्तलब्धीची तपशिलवार माहितीही गोळा करण्यात येणार आहे. ही वेतनाबाबतची माहिति दरवर्षी अद्यावत करावयाची आहे. माहिति नोंदणी करिता अर्थ व सांख्यिकी संचालनालयाकडून संगणकीय ऑनलाईन आज्ञावली तसेच लॉग-इन आयडी व पासवर्ड आणि सूचनासंच संबधित कार्यालयांना उपलब्ध करून देण्यात येईल. कर्मचाऱ्यांचा सर्वंकष माहितीकोष (Employees Master Database - EMDb) वेळेत अद्यावत करण्यासाठी व त्याची कार्यवाही योग्य प्रकारे पार पाडण्यासाठी राज्य शासनाचे सर्व आहरण व संवितरण अधिकारी, यांनी पुढील वेळापत्रक व सूचना विचारात घेऊन त्यानुसार कार्यवाही करावी.

**वेळापत्रक**

| **तपशील** | **कालावधी** |
|---|---|
| Login Id व password संचालनालयाने उपलब्ध करणे | १ डिसेंबर, २०१६ ते १५ डिसेंबर, २०१६ |
| आहरण संवितरण अधिका-याने माहिति सादर करणे व पहिले प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे | १६ डिसेंबर, २०१६ ते ३१ जानेवारी, २०१७ |
| आहरण संवितरण अधिका-याने माहिति बरोबर असल्याचे दुसरे प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे | मे, २०१७ |

## २. <u>आहरण व संवितरण अधिका-यांसाठी सूचना</u>

अ) राज्य शासकीय कार्यालयांतील प्रत्येक आहरण व संवितरण अधिकारी यांनी अर्थ व सांख्यिकी संचालनालय, वांद्रे, मुंबई / जिल्हा सांख्यिकी कार्यालय, मुंबई शहर / मुंबई उपनगर / संबंधित प्रादेशिक / जिल्हा सांख्यिकी कार्यालयाकडून ऑनलाईन आज्ञावलीकरिता लॉग-इन आय.डी. व पासवर्ड उपलब्ध करून घ्यावे. सदर माहितीकोषासाठी संबंधित कार्यालयातील कर्मचाऱ्यांची माहिती दिनांक १ ऑक्टोबर, २०१६ या संदर्भ दिनांकास अनुसरून अद्यावत करण्यासाठी Employees Master Database २०१५ या महिन्यातील सेवार्थ प्रणालीमध्ये त्यांच्या कार्यालयाने भरलेली माहिती आधारभूत माहिती राहिल. माहिती भरण्याचे सूचनासंच कार्यालयांना ऑनलाईन आज्ञावलीमधे उपलब्ध करून दिले जातील. अशी कार्यवाही यानंतर प्रत्येक वर्षी करावी.

आ) राज्य शासनाच्या कार्यालयांची आहरण व संवितरण अधिकारीनिहाय माहिती ऑनलाईन स्वरुपात संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना अद्यावत करण्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. ज्या कर्मचाऱ्यांच्या माहितीचा समावेश आधारभूत माहितीत असून ते दिनांक १ ऑक्टोबर, २०१६ या संदर्भ दिनांकास संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या कार्यकक्षेत आहेत, अशा कर्मचाऱ्यांची संगणकीय ऑनलाईन आज्ञावलीमध्ये माहिती नोंदणी अद्यावत करावयाची आहे. याशिवाय, नवीन कर्मचाऱ्यांची (जसे बदली होऊन आलेले अथवा नवीन नेमणूक झालेले, इ.) माहिती आणि आधारभूत माहितीत समाविष्ट नसलेल्या पण दिनांक १ ऑक्टोबर, २०१६ रोजी आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या कार्यकक्षेत असलेल्या कर्मचाऱ्यांची माहिती देखील या संचालनालयाने दिलेल्या ऑनलाईन आज्ञावलीमध्ये सादर करावयाची आहे, अशी कार्यवाही यापुढे प्रतिवर्षी करावी.

इ) ऑक्टोबर महिन्यात स्वेच्छानिवृत्ती घेतलेल्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत ते जरी दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१६ रोजी शासनाचे कर्मचारी नसेल तरी, ऑक्टोबर महिन्यात त्यांच्यावर शासनाचा निधी खर्ची पडला असल्याने, अशा कर्मचाऱ्यांचा देखील समावेश माहितीकोषात करावा. या सूचना प्रत्येक वर्षी माहिती अद्यावत करण्यासाठी लागू राहतील.

ई) उपलब्ध करून दिलेल्या ऑनलाईन आज्ञावलीच्या सूचनासंचात तसेच युजर मॅन्यूअलमध्ये दिलेल्या सूचनांचे पालन करून योग्य रीतीने कर्मचाऱ्यांची माहिती नोंदणी करावयाची आहे. माहिती नोंदणी करताना <u>कार्यकक्षेत येणा-या सर्व कर्मचाऱ्यांची माहिती नोंदणी करण्याची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावयाची आहे.</u> अशा प्रकारे ऑनलाईन नोंदणी केलेली माहिती संचालनालयास सादर केल्याचे प्रमाणपत्र बृहन्मुंबईकरिता अर्थ व सांख्यिकी संचालनालयाच्या वांद्रे / जिल्हा सांख्यिकी कार्यालय, मुंबई शहर / मुंबई उपनगर व प्रादेशिक कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई येथे, तर राज्यातील उर्वरित जिल्ह्यात त्या त्या जिल्हा सांख्यिकी कार्यालयांत द्यावयाचे आहे. सदर प्रमाणपत्र सादर केल्यानंतर अर्थ व सांख्यिकी संचालनालयाकडून माहिती प्राप्त झाल्याचे प्रमाणपत्र संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. जानेवारी, २०१७ च्या वेतन देयकासोबत (January २०१७ to be paid in February २०१७) अशा प्रकारचे प्रमाणपत्र

जोडले नसल्यास जानेवारी, २०१७ ची वेतन देयके कोषागार कार्यालय / अधिदान व लेखा कार्यालयात स्वीकारली वा पारित केली जाणार नाहीत. या सूचना प्रत्येक वर्षी माहिती अद्यावत करण्यासाठी लागू राहतील.

उ) शासकीय कार्यालयांनी उपलब्ध करुन दिलेल्या माहितीची तपासणी अर्थ व सांख्यिकी संचालनालय, वांद्रे, मुंबई / जिल्हा सांख्यिकी कार्यालय, मुंबई शहर, मुंबई उपनगर / प्रादेशिक कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई / जिल्हा सांख्यिकी कार्यालय यांच्याकडून करण्यात येऊन माहिती तपासल्याचे प्रमाणपत्र उपलब्ध करुन देण्यात येईल. हे दुसरे प्रमाणपत्र मे, २०१७ च्या वेतन देयकासोबत (May, २०१७ to be paid in June २०१७) जोडून वेतन देयके कोषागारात सादर करावयाची आहेत. अशा प्रकारचे माहिती तपासल्याचे प्रमाणपत्र मार्च, २०१७ च्या वेतन देयकासोबत जोडले नसल्यास वेतन देयके कोषागारात स्वीकारण्यात येणार नाहीत. प्रमाणपत्राशिवाय कोषागार कार्यालयांनी वेतन देयके पारित करु नयेत. या सूचना प्रत्येक वर्षी माहिती अद्यावत करण्यासाठी लागू राहतील.

ऊ) ज्या शासकीय कार्यालयांची वेतन देयके कोषागारात सादर होत नाहीत, अशा सर्व कार्यालयांनी सुध्दा त्यांच्या कर्मचाऱ्यांची व रिक्त पदांची माहिती ऑनलाईन आज्ञावलीद्वारे नोंदणी करून जिल्हा सांख्यिकी अधिकारी यांच्याकडे दिनांक १६ डिसेंबर, २०१६ ते दिनांक ३१ डिसेंबर, २०१६ या कालावधीत सादर करावी.

३. ऑनलाईन संगणकीय आज्ञावलीमध्ये माहिती भरण्यात काही अडचणी आल्यास संबंधितांनी अर्थ व सांख्यिकी संचालनालय, वांद्रे, मुंबई / संबधित जिल्हा सांख्यिकी कार्यालय / प्रादेशिक कार्यालय यांच्याशी संपर्क साधून त्याबाबत खुलासा प्राप्त करून घ्यावा. सर्व कार्यालयांनी कार्यवाही विहीत वेळेत पूर्ण होण्याकरिता लॉग - इन आय. डी. व पासवर्ड वेळापत्रकानुसार प्राप्त करून घ्यावे. त्यासोबत माहिती भरण्याचे व आज्ञावली वापरण्यासंबंधीचे सूचनासंच उपलब्ध करून दिले जातील.

४. सर्व कोषागार / उप कोषागार अधिकाऱ्यांनी माहितीकोषाच्या कामी अर्थ व सांख्यिकी संचालनालयास संपूर्ण सहकार्य देऊन माहितीकोषाबाबत जी कार्यवाही अपेक्षित असेल ती पार पाडावी. माहिती अद्यावत झाल्याबाबतचे अर्थ व सांख्यिकी संचालनालयाने दिलेले प्रमाणपत्र जानेवारी, २०१७ च्या वेतन देयकासोबत व त्यातील माहिती बरोबर असल्याबाबतचे प्रमाणपत्र मे, २०१७ च्या वेतन देयकासोबत जोडलेले नसल्यास अशा कार्यालयांची देयके अधिदान व लेखा कार्यालयाने / कोषागाराने न स्वीकारता संबंधित कार्यालयांना ती योग्य त्या पूर्ततेसाठी परत पाठवावीत. मात्र जे राज्य शासकीय कर्मचारी नाहीत अशांच्या वेतन देयकांबाबत ही कार्यवाही लागू नाही. (उदा. मा. राज्यपाल, आमदार, मंत्रिमंडळाचे सर्व सदस्य इ.)

५. कोषागार / उप कोषागार अधिकाऱ्यांनी वरील सूचना तातडीने सर्व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणाव्यात.

६. सदर परिपत्रक वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २१५/१६/कोषा प्र-५ दिनांक २५-११-२०१६ अन्वये नियोजन विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१६१२०३१७१७१६७५१६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55fdd77fa8877b50fd182206f763c590c30ce698809f79d37b145fd63e375059, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2016.12.03 17:19:47 +05'30'

**(प्रियांका रं. छापवाले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
४) सर्व मंत्रालयीन विभाग, यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्या अधिनस्त सर्व विभाग प्रमुख / सर्व कार्यालय प्रमुख, सर्व संचालनालये यांना या अनुषंगाने कळविण्यात यावे.
५) प्रधान सचिव, वित्त विभाग /कोषा प्र-५, मंत्रालय, मुंबई -३२
६) सर्व महानगरपालिका आयुक्त
७) * सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) * सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
९) * प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई-३२
१०) प्रबंधक, मूळ / ॲपिलेट शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
११) जिल्हाधिकारी (सर्व)
१२) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी आणि मुख्य लेखा व वित्त अधिकारी
१३) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१४) संचालक, शासकीय मुद्रण व लेखन सामग्री संचालनालय, मुंबई
१५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१६) संचालक नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१७) सर्व प्रादेशिक सह संचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय

१८) सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण / पुणे / नागपूर / नाशिक / औरंगाबाद / अमरावती

१९) उप संचालक, नगरपालिका प्रशासन, नवी मुंबई / पुणे / नागपूर / औरंगाबाद

२०) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई-३२

२१) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१

२२) सर्व कोषागार / उप कोषागार अधिकारी

२३) सर्व जिल्हा सांख्यिकी अधिकारी, जिल्हा सांख्यिकी कार्यालय

२४) निवड नस्ती (का-१४१७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

* पत्राने